**आदिवासी विकास विभागातील बांधकाम व्यवस्थापन कक्षातील कार्यरत अधिकाऱ्यांसाठी मार्गदर्शक सूचना व वित्तीय अधिकार वापरताना अंमलात आणावयाची कार्यपध्दती याबाबतचे निर्देश.**

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः टिएसपी-२०१७/प्र.क्र.१९७/कार्या-६

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २२ ऑगस्ट,२०१७

**वाचा :-**

१. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांकः शा.आ.बां.-२०१६/प्र.क्र.३/बांव्यक, दि. १८/०१/२०१७.

**प्रस्तावना-**

शासकीय आश्रमशाळा व वसतिगृह इमारतींचे मूळ बांधकाम करणेसाठी राज्यस्तरावरील योजनातून निधी उपलब्ध करण्यात येत असून या इमारतींचे देखभाल व दुरुस्तीसाठी जिल्हास्तरावरुन निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. या योजनेअंतर्गत कामांची अंमलबजावणी करतांना कामांचे सर्वेक्षण, अंदाजपत्रके,निविदा प्रपत्रे मंजूरी करणे,करारनामे, कामांचे मोजमाप व गुणवत्ता तपासणे, कामांचे देयक अदा करणे, अदा केलेल्या देयकानुसार रोकडवही राखणे, महालेखापालाशी खर्चाचा ताळमेळ करणे, महालेखापालांच्या परिच्छेदांचे अनुपालन करणे इ. प्रक्रिया कार्यान्वित होणार आहे. याबाबत शासन निर्णय दि. १८.०१.२०१७ अन्वये बांधकाम व्यवस्थापन कक्षातील मुख्य अभियंता, अधिक्षक अभियंता, कार्यकारी अभियंता, उप अभियंता आणि कनिष्ठ अभियंता/शाखा अभियंता यांना तांत्रिक, वित्तिय व इतर मंजूरी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहे. वरील कामांची अंमलबजावणी करतांना बांधकाम व्यवस्थापन कक्ष व प्रकल्प कार्यालय यांच्यात समन्वय साधून कामाची गती व गुणवत्ता राखण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे कार्यपध्दत विहीत करण्यात येत आहे .

**शासन परिपत्रक-**

१) राज्य स्तरावरील निधीतून आश्रमशाळांच्या व वसतीगृहांच्या बांधकामांची व जिल्हास्तरीय निधीतून आश्रमशाळा व वसतीगृहांच्या इमारतींची दुरूस्तीची कामे घेतांना अशा बांधकामांचे व इमारत दुरूस्तींचे प्राधान्यक्रम संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्याकडून ठरविण्यात येतील.

२) प्रकल्प अधिकारी यांनी प्राधान्यक्रमाने निश्चित केलेल्या बांधकामांची व दुरुस्तीच्या कामांची अंमलबजावणी  करण्यासाठी त्याक्रमाने निविदा मागविण्यात यावी.

३) राज्यस्तरीय निधीतून करण्यात येणाऱ्या शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहे यांची बांधकामे तसेच जिल्हास्तरीय निधीतून करण्यात येणारी आश्रमशाळा व वसतीगृहे इमारत दुरूस्तींची कामे करण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यपद्धती विहीत करण्यात येत आहे.

अ) <u>राज्यस्तर योजना</u>: -

१. राज्य स्तरावरील शासकीय आश्रमशाळा (इंग्रजी माध्यमाच्या आश्रमशाळेच्या समावेशासह) व शासकीय वसतिगृह बांधकामाच्या निधीसाठी "नियंत्रक अधिकारी" अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नाशिक व नागपूर यांना घोषित करण्यात येत आहे.

२. शासकीय आश्रमशाळा व बांधकामासाठीचा निधी अर्थसंकल्पीत तरतूदीनुसार संबंधीत अधिक्षक अभियंता यांना आयुक्त(आदिवासी विकास ) यांचेकडून BEAMS वर वितरीत करण्यात येईल.

३. अधिक्षक अभियंता यांनी त्यांचे कार्यक्षेत्रातील बांधकामाचा निधी संबंधित कार्यकारी अभियंता,सा.बां. (आदिवासी) विभाग यांना BEAMS प्रणालीवर वितरीत करावा.

४. संबंधीत कामांचे मुल्यमापन कार्यकारी अभियंता/उपअभियंता यांचेकडून करण्यात येवून त्यानुसार कामाचा प्रगती अहवाल प्रकल्प अधिकारी यांना देऊन त्यांच्या सहमतीने कामाच्या प्रगती व प्राधान्यानुसार निधी वितरणाबाबत कार्यकारी अभियंता यांनी कार्यवाही करावी.

५. कार्यकारी अभियंता (बांधकाम व्यवस्थापन कक्ष) यांनी केलेल्या कामाच्या भौतिक व आर्थिक प्रगतीसह प्रकल्प अधिकारी, संबंधित अपर आयुक्त (आदिवासी विकास) व आयुक्त (आदिवासी विकास) नाशिक तसेच अधिक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ व मुख्य अभियंता (बांधकाम व्यवस्थापन कक्ष) आदिवासी विकास विभाग यांना विहीत उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) यासह मासिक अहवाल सादर करावा.

ब) <u>जिल्हास्तर योजना</u>:-

१. शासकीय आश्रमशाळा व वसतिगृह दुरुस्ती व देखभालीसाठीच्या जिल्हास्तरावरील जिल्हा योजनेचा निधी जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती यांचेकडून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना वितरीत केला जाईल.

२. कार्यकारी अभियंता, सा.बां. (आदिवासी) विभाग हे जिल्हा नियोजन समिती मार्फत मंजूर प्रशासकीय मान्यता प्राप्त कामांकरीता लागणाऱ्या निधीची मागणी विहित प्रपत्रात संबंधित प्रकल्प अधिकारी यांना करतील.

३. प्रकल्प अधिकारी सदर निधी त्यांच्या कार्यक्षेत्रातील संबंधित कार्यकारी अभियंता, सा.बां.(आदिवासी) विभाग यांना त्यांच्या कामांची प्रगती तपासून मागणीनुसार वितरीत करतील.

४. कामाचे करारनामे कार्यकारी अभियंता,सा.बां.(आदिवासी) विभाग यांच्यासोबत झालेले असल्याने कार्यकारी अभियंता,सा.बां.(आदिवासी) विभाग हा निधी आहरीत करतील. तथापि

निधी जिल्हा नियोजन समितीच्या अधिनस्त असल्याने, जिल्हा नियोजन समितीच्या कार्यक्षेत्राबाहेर खर्च करता येणार नाही.

५. कार्यकारी अभियंता (बांधकाम व्यवस्थापन कक्ष) हे केलेल्या खर्चाचे कामाच्या भौतिक प्रगतीसह विहित उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) यासह मासिक अहवाल जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, प्रकल्प अधिकारी, संबंधित अपर आयुक्त व अधिक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ व मुख्य अभियंता(बां.व्य.क.) यांना सादर करतील.

सदर कार्यपध्दती चढत्या क्रमाने अर्थसंकल्पीय अंदाज सादर करण्यासाठी अंमलात राहील. राज्यस्तर व जिल्हास्तरीय बांधकामाच्या व  दुरुस्तीच्या योजनांसाठी कामनिहाय मागणीपत्र कार्यकारी अभियंता, सा.बां.(आदिवासी) व संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्या संयुक्त मान्यतेने करण्यात यावे. त्याचबरोबर कामाचे करारनामा कार्यकारी अभियंता,सा.बां. (आदिवासी) विभाग यांच्यासोबत झाल्यामुळे महालेखापाल कार्यालयाशी खर्चाचे ताळमेळ करण्याची जबाबदारी त्यांची राहील. त्याचबरोबर वेळोवेळी शासनस्तरावर माहिती उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी अधिक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ व कार्यकारी अभियंता,सा.बां. (आदिवासी) विभाग यांची राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०८२११६४२४९४४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: CN = Bhagwan Maruti Sawant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Tribal Development
Date: 2017.08.22 14:32:48 +05'30'

भगवान सावंत
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर   मुख्य सचिव .

३. मा. विरोधी पक्ष नेते, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य.

४. मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

५.आयुक्त (आदिवासी विकास), नाशिक.

६.मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

७.महालेखापाल१ / २ (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.

८.सर्व अपर आयुक्त (आदिवासी विकास).

९.सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य.

१०.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

११.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ नाशिक/नागपूर.

१२.सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग.

१३.सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.निवडनस्ती (कार्या-६).